मौजे मंगरुळ (ई), ता. चिखली, जि. बुलडाणा येथील टंचाई निवारणार्थ तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई २०२२/प्र.क्र. ४९/पापु १४**

जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
दिनांक: १५ मार्च, २०२४

**वाचा -**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई १०९९/प्र.क्र. १२/पापु १४, दिनांक ३.२.१९९९
२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक: टंचाई २०१६/प्र.क्र.१४३/पापु १४, दिनांक ४.५.२०१६
३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा यांचे क्रमांक जा.क्र.बुजिप/ग्रापापुवि/पाटं/६९१५/२०२३, दिनांक २६.१२.२०२३ चे पत्र.
४) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, टंचाई २०२२/प्र.क्र. ४९/पापु-१४ दि.२७.०४.२०२२

**प्रस्तावना -**

सन २०२१-२२ च्या टंचाई कालावधीसाठी टंचाई उपाययोजने अंतर्गत मौजे मंगरुळ (ई), ता. चिखली, जि. बुलडाणा या योजनेच्या तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेच्या रुपये ५६,९८,७१०/- किंमतीच्या प्रस्तावास वाचा येथील अ.क्र.४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. तथापि, सदर योजनेच्या अंदाजपत्रकामध्ये GST रक्कमेची तरतूद १२ % प्रमाणे करण्यात आलेली होती. परंतु संबंधीत कंत्राटदाराने १८% याप्रमाणे GST रक्कमेची मागणी केली आहे. त्यामुळे मूळ मंजूर योजनेच्या किंमतीत रु. ३,०५,४९०/- इतकी वाढ होत आहे. त्यामुळे कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा यांनी संदर्भ क्रमांक-०३ येथील पत्रान्वये रु. ६०,०४,०००/- इतक्या ढोबळ किंमतीचे अंदाजपत्रक सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदर सुधारित अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलढाणा यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार मौजे मंगरुळ (ई),

ता. चिखली, जि. बुलडाणा या योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन मौजे मंगरुळ (ई), ता. चिखली, जि. बुलडाणा या तात्पुरत्या पाणी पुरवठा योजनेचा रुपये ६०,०४,००० /- (अक्षरी रुपये साठ लाख, चार हजार फक्त ) किंमतीच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून टंचाई अंतर्गत सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरीच्या व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

२) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणीपुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी वीजदेयके न भरल्यामुळे बंद पडल्या असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

**२. याकरिता होणारा खर्च “मागणी क्र. वाय-२, मुख्य लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषद पंचायत / संस्थांना सहाय्य, ०२ जिल्हा परिषदांना अनुदान, (०२)(०३) आकस्मिक पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या तात्पुरत्या उपाययोजनांसाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए १९५) या लेखाशीर्षांखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागवावा व त्याखाली अंतिमतः खर्ची टाकण्यात यावा.**

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५१५५३४९०३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUGANDHA DEEPAK PAWAR

Digitally signed by SUGANDHA DEEPAK PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=d4ecddac21f58159928daa9563eab597448bd1556ca3f9caa9101e05e9a13341,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B7D94472B912CB3702FBA035D0A51948B4F9C9AE9051C2DEE02FFCA4B1014CEA,
cn=SUGANDHA DEEPAK PAWAR
Date: 2024.03.15 17:57:46 +05'30'

**(सुगंधा पवार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखाकार, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (म. व पु.), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई
८. विभागीय आयुक्त, अमरावती
९. जिल्हाधिकारी, बुलडाणा
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा
११. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा
१२. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक
१३. पापु १४ (निवडनस्ती)